आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयंम योजनेसाठी निधी वितरण.
(लेखाशीर्ष २२२५ ई ०२४)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र. २/कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : - २४ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.७.२०२४
२) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र.बजेट-१८२४/प्र.क्र. ९७/का-१२.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयंम योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मुख्य लेखाशिर्ष २२२५ ई ०२४ , ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) याखाली पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयंम योजनेकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.कोटीत)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पीय तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ |
| पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयंम योजना | २२२५ई०२४ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | १५०.०० | ३०.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **रुपये ३०.०० कोटी (अक्षरी रुपये तीस कोटी फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. विभागाने ज्या प्रयोजनासाठी निधीची मागणी केली आहे. त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची जबाबदारी विभागाची राहील.

५. सदर प्रकरणी विहीत कार्यपध्दतीचा अवलंब केल्याची खातरजमा करुनच सदरचा खर्च करण्याबाबतची जबाबदारी विभागाची राहील.

६. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षनिहाय/ उपलेखाशीर्षनिहाय शिष्यवृत्ती अदा करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांचा तपशील इ. माहिती आदिवासी विकास विभागास पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१ येथील शासन परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन व वित्त विभाग ई ऑफिस टिप्पणी क्र. ३९, दि. १२.२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२५०२२४१६०३३४२९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2025.02.24 16:04:34 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री , आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१०.सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मीक आदिवासी विकास प्रकल्प

११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१२.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१३.कार्यासन अधिकारी १२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४.निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.